लेखाशीर्ष ४४०२ ११४८ भांडवली खर्च या
मधील अनुदानाचे पुनर्वाटप

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-१६१८/प्र.क्र.२३९/पापु १५

७वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०००01
तारीख: २३ ऑगस्ट,२०१८

## प्रस्तावना

वित्तीय वर्ष २०१८-२०१९ करीता मुख्य लेखाशीर्ष ४४०२ ११४८ अंतर्गत ०२ मजुरी या उप शिर्षाखाली रु.३.३० लक्ष व ०५२ यंत्रसामुग्री व साधनसामग्री या उप शिर्षाखाली रु.५३.८४ लक्ष इतकी तरतुद भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेस मंजुर करण्यात आली आहे.

प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अमरावती विभाग, अमरावती यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील श्री.मोहंमद सादिक शेख अमीर व अन्य रोजंदारी कर्मचा-यांनी विविध न्यायालयात दाखल केलेल्या दाव्यावर संबंधितांस मजुरी/थकबाकी देणेबाबत मा.न्यायालयांनी आदेश पारीत केलेले आहेत. सदर थकीत मजुरीची रक्कम अदा करण्याकरीता रु.१०,७०,२५७/- अनुदान उपलब्ध करुन देण्याकरीता प्रस्ताव उपसंचालक, अमरावती यांनी संचालनालयाकडे सादर केला आहे. तथापि चालु वित्तीय वर्षात संचालनालयाकडे -लेखाशीर्ष ४४०२ ११४८ मधील उपशीर्ष ०२- मजुरी मध्ये अल्प अनुदान मंजुर असल्याने यामधुन रोजंदारी कर्मचा-यांप्रकरणी थकीत रक्कम व मासिक मजुरी अदा करणे शक्य होत नसल्याचे नमुद करुन लेखाशीर्ष ४४०२ ११४८ मधील रु.१४.०० लाख पुनर्वितरणाचा प्रस्ताव संचालनालयाने सादर केला आहे. सदर बाब विचारात घेता उक्त लेखाशीर्षांतर्गत ०२ मजुरी या उपलेखाशीर्षाखाली पुनर्वितरणाने आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

वित्तीय वर्ष २०१८-२०१९ च्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अर्थसंकल्पातील उपलब्ध तरतुदींपैकी मागणी क्र.वाय-६, मुख्य लेखाशीर्ष ४४०२, मृद व जलसंधारणावरील भांडवली खर्च, ४४०२ ११४८ या लेखाशीर्षाखालील ०५२ यंत्र सामग्री व साधन सामग्री या उद्दिष्टामध्ये होणारी बचत विचारात घेऊन रु.१४.०० लक्ष इतका निधी याच लेखाशीर्षाखालील ०२ मजुरी या उद्दिष्टाखालील वाढीव खर्चासाठी पुनर्वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

संबंधित अधिका-यांनी पुनर्वितरणानंतरच्या सुधारित तरतुदींची नोंद घेऊन सदर निधीच्या वितरणाबाबतची पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन निर्णय दि.१७.०४.२०१५ च्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग तीन, अ.क्र.३ परिच्छेद.क्र.१६६ मधील तरतुदींनुसार विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२३१७२४२८४३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh
Bhagwan
Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d1f670a17d77c8ddff69694de2a07b7ff855dafef954aefa82ca28bd6cc6adb6, serialNumber=14841ecd32c757d5bdc1bc806fcf798e88e12bf053f8b2c43a5b1825ab9eb880, cn=Mahesh Bhagwan Sawant
Date: 2018.08.23 17:43:37 +05'30'

**(महेश सावंत)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
२. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई/२-नागपूर (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
३. उप सचिव, वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई
४. उप संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
५. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
६. उप अभियंता (यां), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
७. कक्ष अधिकारी/लेखाधिकारी, पापु-०१, पापु-०४, पापु-२०
८. निवड नस्ती (पापु-१५)